संचालक, नगर रचना व मूल्य निर्धारण विभाग, पुणे यांच्या आस्थापनेवरील सहायक संचालक, नगर रचना संवर्गातील अधिकाऱ्यांच्या मध्यावधी बदल्या/ प्रतिनियुक्ती बाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : बदली-५८१९/प्र.क्र.१४१/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : १८ फेब्रुवारी, २०२०.**

वाचा :- (१) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदोन्न-१३१९/१४९१/प्र.क्र.३४(३)/नवि-२७, दि.२७.०८.२०१९.
(२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : ठामपा-२११६/प्र.क्र.३१(अ)/नवि-२३, दि.१९.०९.२०१९.

**प्रस्तावना :-**

संचालक, नगररचना व मुल्य निर्धारण विभागाच्या आस्थापनेवरील सहायक संचालक, नगर रचना पदावरील अधिकाऱ्यांच्या मध्यावधी बदल्या/प्रतिनियुक्तीने पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर पदावरील खालील अधिकाऱ्यांच्या बदली / प्रतिनियुक्तीने पदस्थापनेबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील परिशिष्ट-तीन, नियम ४० (१) (२) (३) (४) व परिशिष्ट-दोन मधील अटी व शर्तीनुसार व प्रशासकीय कारणास्तव संदर्भ क्र.१ अन्वये करण्यात आलेल्या बदलीमध्ये अंशत: बदल करुन खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार संचालक, नगररचना व मुल्य निर्धारण विभागाच्या आस्थापनेवरील सहायक संचालक, नगर रचना संवर्गातील अधिकाऱ्यांच्या मध्यावधी बदल्या करुन बदली/ प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | दि.२७.०८.२०१९ च्या शासन आदेशान्वये बदलीने/ प्रतिनियुक्तीने पदस्थापना केलेले कार्यालय | बदली/प्रतिनियुक्ती नंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.सु.दे. निकुंभे | सहायक संचालक, नगर रचना, यो.क्र.१ व २ वि.घ. इचलकरंजी | सहायक संचालक, नगर रचना, श्रीरामपूर तथा (लवाद, नगर योजना) |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | दि.२७.०८.२०१९ च्या शासन आदेशान्वये बदलीने/ प्रतिनियुक्तीने पदस्थापना केलेले कार्यालय | बदली/प्रतिनियुक्ती नंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| २. | श्री.प्र.ल. गोहील | सहायक संचालक, नगर रचना, नागपूर महानगरपालिका (प्र.नि.) | सहायक संचालक, नगर रचना, ठाणे महानगरपालिका (प्र.नि.) (संदर्भ क्र.२ अन्वये ठाणे मनपा मध्ये निर्माण केलेल्या नवीन पदावर) |

**०२.** संदर्भ क्र. १ येथील दि.२७.०८.२०१९ च्या शासन निर्णयान्वये श्री.प्र.भा.गावंडे, सहायक संचालक, नगर रचना यांची सहायक संचालक, महानगरपालिका, चंद्रपूर (प्र.नि.) येथे झालेली बदली याव्दारे रद्द करण्यात येत आहे.

**०३.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वरील अधिकाऱ्यांना बदलीने/प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या ठिकाणी रुजू होण्याकरिता आवश्यक ते कार्यकारी आदेश तातडीने निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

**०४.** या आदेशान्वये प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे बदली/प्रतिनियुक्तीबाबतचे कार्यकारी आदेश प्राप्त होताच बदली/प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी तातडीने रुजू व्हावे.

**०५.** सदरहू आदेशान्वये बदली/प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास त्याची संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

**०६.** सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२००२१८१४४११४७६२५ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.02.18 15:31:35 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

संबंधित अधिकारी यांना,
(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत.)

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
९. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
१०. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
११. आयुक्त, चंद्रपूर महानगरपालिका, चंद्रपूर.
१२. जिल्हाधिकारी, ठाणे/अहमदनगर.
१३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
१४. सह संचालक, नगर रचना------------------------.
१५. उप संचालक, नगररचना ------------------ .
१६. निवडनस्ती/नवि-२७.